आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०२१-२२ या वर्षात आदिवासी कुटुंबाच्या परसबागेत फळझाडे व भाजीपाला लागवड करणे या योजनेकरीता निधी वितरण.
लेखाशीर्ष-२४०१ अे ८०६

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०२१/प्र.क्र.७/कार्यासन-६**
मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २० डिसेंबर,२०२१.

**वाचा :-**

१) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.२४.०६.२०२१ व दि.१४.१०.२०२१.

२) कृषि व पदुम विभागाची नस्ती क्र. आपयो-२०२१/प्र.क्र.१०८/९ अे.

**प्रस्तावना :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत कृषी व पदुम विभागामार्फत अंमलबजावणी करण्यात येत असलेल्या आदिवासी कुटुंबाच्या परसबागेत फळझाडे व भाजीपाला लागवड करणे या योजनेंतर्गत अनुसूचित जमाती घटकासाठी रु.१८.०० लाख इतका निधी वितरीत करण्याबाबत कृषी व पदुम विभागाकडून संदर्भाधीन क्र.२ अन्वये सादर करण्यात आलेल्या प्रस्तावास अनुसरुन निधी वितरणाची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आदिवासी घटक कार्यक्रम अंतर्गत मागणी क्र.टी-५ मधील २४०१, पीक संवर्धन या मुख्य लेखाशीर्षाखाली आदिवासी कुटुंबाच्या परसबागेत फळझाडे व भाजीपाला लागवड करणे या योजनेंतर्गत वित्त विभागाने मान्यता दिल्यानुसार सन २०२१-२२ च्या आर्थिक वर्षाच्या उपलब्ध तरतुदींतून ६० टक्के मर्यादेतील रु.१८.०० लाख इतका निधी पुढीलप्रमाणे वितरीत व खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे :-

**(रु. लाखात)**

| योजना | लेखाशीर्ष | बाब | सन २०२१-२२ मधील अर्थसंकल्पीत तरतूद | सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येत असलेली तरतूद |
|---|---|---|---|---|
| आदिवासी कुटुंबाच्या परसबागेत फळझाडे व भाजीपाला लागवड करणे | २४०१ एट०६ | ३३-अर्थसहाय्य | ३०.०० | १८.०० |

२. उपरोक्त प्रमाणे **एकूण रु.१८.०० लाख (अक्षरी रुपये अठरा लाख फक्त)** इतका निधी प्रशासकीय विभाग प्रमुख म्हणून सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर (BEAMS) वितरीत व खर्च करण्यास याद्वारे शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

३. सदर तरतुद खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.२४.०६.२०२१ व दि.१४.१०.२०२१ च्या शासन निर्णयातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करण्याची जबाबदारी संबंधित प्रशासकीय विभागाची राहील.

४. नियंत्रण अधिकारी व विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात, आदिवासी उपयोजना बाह्य क्षेत्रात केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी. त्या अनुषंगाने झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय/उपलेखाशिर्षनिहाय साध्य झालेले भौतिक उद्दिष्टाबाबतची माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र इ. माहिती आदिवासी विकास विभागास प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवावी.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या वाचा क्र.१ अन्वये विभागास प्रदान केलेल्या अधिकारान्वये व वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.१०७३/व्यय-१४, दि.०६.१२.२०२१ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११२२०१२०५५९६५२४ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAVINDRA D AUTE

Digitally signed by RAVINDRA D AUTE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f05a6913f9dee1f453c9a1c5a89d8c4897737ba8e4ac0edf3f2c6e69e25f4108, pseudonym=C4ECFFC229308BD3BD1E334FAC78848FBF7F7613, serialNumber=CA98EFAC317508AB9B5820B47955BC1BABB173F20D25ABD816ED91A9B6B0F16C, cn=RAVINDRA D AUTE
Date: 2021.12.20 15:25:39 +05'30'

**( रविंद्र दि. औटे )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई-३२
२. मा. राज्यमंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई-३२
३. सचिव ( कृषि ) कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. आयुक्त ( कृषि), महाराष्ट्र राज्य,पुणे.
५. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
६. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक / नागपूर / ठाणे / अमरावती.
७. वित्त विभाग ( अर्थसंकल्प- १९/ व्यय १४ ), मंत्रालय, मुंबई.
८. कृषि व पदुम विभाग मंत्रालय, मुंबई.
९. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा मजला, विधानभवन, मुंबई.
१०. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
११. कार्यासन क्र. २ व ९, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
१२. निवड नस्ती (का.६), आदिवासी विकास विभाग